धुळे जिल्हा कारागृहाच्या तटाच्या बाजूला
चार टेहळणी मनोरे बांधण्यास प्रशासकीय
मान्यता देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक- बीएलडी-१४९८/१/प्र.क्र.२९/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:- ३१ मे २०००.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/२२९८/९६९/कक्ष-३ दिनांक १३.४.९८.
२) शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.विअप्र-१०९२/प्र.क्र.११३/९२/विनियम दिनांक १.६.१९९२.

**शासन निर्णय:-** धुळे जिल्हा कारागृहाच्या तटाच्या बाजूला टेहळणी मनोरे बांधण्याच्या आवश्यकतेबाबत कारागृह महानिरीक्षक यांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे की, धुळे जिल्हा कारागृहाचे एकूण क्षेत्रफळ ६ एकर १२ गुंठे इतके असल्यामुळे व कारागृहातील बंद्यांची संख्या जवळपास ४०० पर्यंत असल्यामुळे त्यावर नियंत्रण ठेवणे कठीण जात आहे. धुळे जिल्हा कारागृह शहराच्या मध्यवस्तीत असल्यामुळे कारागृहाच्या चारही बाजूला शहराचे मुख्य रस्ते गेले आहेत. त्यामुळे बाहेरची कोणतीही व्यक्ती कारागृहाच्या मुख्य भिंतीपाशी येऊ शकते व त्यामुळे कारागृहाच्या सुरक्षेला धोका निर्माण होऊ शकतो. कारागृहाच्या आंतरबाहय सुरक्षेच्या दृष्टीने व बंद्यांच्या हालचालीवर नियंत्रण ठेवणे सोईस्कर व्हावे याकरिता कारागृहाच्या तटभिंतीच्या बाजूला चार टेहळणी मनोरे बांधणे आवश्यक आहे.

२. कारागृह महानिरीक्षक यांनी धुळे जिल्हा कारागृहाच्या तटाच्या बाजूला चार टेहळणी मनोरे बांधण्यासाठी रु.७,२७.६५०/- (रु.सात लक्ष सत्तावीस हजार सहाशे पन्नास फक्त) इतक्या रकमेचे खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा नकाशा शासनास प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केला असून त्यास प्रशासकीय मान्यता द्यावी अशी शासनास विनंती केली आहे.

३. कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास सादर केलेल्या धुळे जिल्हा कारागृहाच्या तटाच्या बाजूला चार टेहळणी मनोरे बांधण्याबाबतचा प्रस्ताव प्रशासकीय मान्यता देण्याकरिता कांही काळ शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर काळजीपूर्वक विचार करुन शासन या आदेशाद्वारे ४ टेहळणी मनोरे बांधण्याकरिता येणारा खर्च रु.७,२७,६५०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता देत आहे.

४. शासनाने यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली प्रकरणे प्रथम प्राथम्याने हाताळावीत व नंतरच या कामास सुरुवात करण्यांत यावी. या कामासाठी प्रस्तावित केलेल्या अनुदानाची तरतूद प्रत्यक्ष अर्थसंकल्पात झाल्याशिवाय सदर कामास सुरुवात करु नये. पुरवणी मागणीद्वारे सन २०००-२००१ च्या अर्थसंकल्पात तरतूद करण्यांत येणा-या अनुदानातूनच बांधकामाचा खर्च भागविण्यात यावा. त्यासाठी अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही. तसेच या बांधकामास केंद्र शासनाकडून ७५% रक्कम मंजूर करुन घेण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

५. या कामासाठी होणारा खर्च मुख्य लेखाशिर्ष -४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१-बांधकाम पंचवार्षिक योजनांतर्गत योजना तुरुंग" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व आर्थिक वर्ष २०००-२००१ मध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

६. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग,नियोजन विभाग व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-१७३५ दिनांक १६.५.२००० च्या संमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( गु.ज.कुळकर्णी )
**कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन**

प्रति,
कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,औरंगाबाद मध्यवर्ती कारागृह,औरंगाबाद.
अधिक्षक,धुळे जिल्हा कारागृह,धुळे.
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल ,महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा)मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे.
वित्त विभाग (व्यय-८) मंत्रालय,मुंबई.
नियोजन विभाग (का.१४७५) मंत्रालय,मुंबई.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा.२) मंत्रालय,मुंबई.
अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई.
निवडनस्ती.